**पुरंदर उपसा सिंचन योजना, जि. पुणे या प्रकल्पास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र:- पुरंदर ०११२/प्र. क्र.(४७/२०१२)/ मोप्र १**
मादाम कामा मार्ग , हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुबंई-४०००३२
दि. ०८ मार्च २०२३

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाचा निर्णय क्र. पुरंदर/उसिंयो/प्रशा-२ / (२९६) / (३८२/९६) दिनांक २४/१२/१९९६.
२) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास पत्र क्र. मकृखोविम/पुरंदर/उसिंयो/२९६/२२८२/दिनांक २४/०३/२०००

**प्रस्तावना :-**

पुणे जिल्हयातील पुरंदर,बारामती, दौंड व हवेली (पुर्वभाग) हे तालुके कमी पर्जन्य छायेच्या प्रदेशात येतात. लाभक्षेत्र उंचसखल डोंगराळ असल्याने इतर प्रवाही सिंचन योजनांचा या भागास लाभ होत नाही. या दुर्गम डोंगराळ भागातील दुष्काळी परिस्थितीवर कायम स्वरूपी उपाययोजना करणेसाठी मुळा-मुठा नदीतून उपसा सिंचन योजनेस मान्यता देण्यात आली आहे.

मूळ प्रशासकीय मान्यतेनुसार पुरंदर उपसा सिंचन योजनेअंतर्गत तीन टप्यात २८३.५०मी. पाणी उचलून २०६०० हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ देण्याचे नियोजन होते. तद्नंतर स्थानिक लोकप्रतिधीनी केलेल्या मागणी नूसार ३७२ मी. उंचीवरील क्षेत्राचा समावेश करून योजना सुधारीत करण्यात आली. योजनेसाठी मंजूर पाणी उपलब्धता ४.०० अघफु असल्याने त्या उपलब्धतेमध्ये सिंचनक्षेत्र वाढविण्यासाठी योजनेची कार्यक्षमता वाढवून सिंचन क्षेत्रात २५४९८ हे. पर्यंत वाढ करण्यात आली. तसेच लाभक्षेत्रातील हलक्या प्रतीच्या जमिनी मध्ये परंपरागत कालवे केल्यास पाण्याचा पाझर जादा होणार असल्याने अपव्यय टाळण्यासाठी खुल्या कालव्याऐवजी बंद पाईप प्रणाली व्दारे वितरण व्यवस्था करण्यात आली आहे.

प्रकल्पास संदर्भ क्रमांक (१) अन्वये मूळ प्रशासकीय मान्यता रुपये १७८.९३ कोटी (दरसुची १९९५-९६) एवढया रकमेस देण्यात आली . त्यानंतर संदर्भ पत्रक्रमांक (२) नुसार प्रकल्पाच्या अधिक्य टिपणीस रू २५० कोटी (दरसूची १९९९-२०००) इतक्या किंमतीची मान्यता देण्यात आली .

दरम्यानचे काळात दरसुचीतील वाढ, भाववाढ, संकल्पनातील बदल, भूसंपादनाच्या किंमतीत झालेली वाढ, इतर कारणांमुळे झालेली वाढ, इत्यादी मुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे.

पुरंदर उपसा सिंचन योजनेचा प्रकल्पाचा रु. ४६०.९५ कोटी किंमतीचा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावा असे व्यय अग्रक्रम समितीने निर्देशित केले होते.

मा. मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमिंमासा , प्रकल्पाची उर्वरीत कामे यांचा परामर्श घेऊन पुणे जिल्ह्यातील अवर्षण प्रवण भागातील ६३ गावातील २५,४९८ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ देण्याच्या अनुषंगाने जलसंपदा विभागाची सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारित रु. ४६०.९५ कोटी इतक्या किंमतीच्या प्रथम सुधारीत प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

पुरंदर उपसा सिंचन योजना, जि. पुणे, या प्रकल्पाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१४-१५ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ४६०.९५ कोटी (रुपये चारशे साठ कोटी पंच्यान्नव लक्ष फक्त) [कामाप्रित्यर्थ रुपये ४५०.९८कोटी ( चारशे पन्नास कोटी अठ्ठयांन्नव लक्ष) व अनुषंगीक खर्च रुपये ९.९७ कोटी ( रुपये नऊ कोटी सत्त्यांन्नव लक्ष)] इतक्या किंमतीस खालील अटीच्या अधीन राहुन प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा परिशिष्ट- “अ” मध्ये सोबत जोडला आहे.

१. प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.
२. संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.
३. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
४. सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक अनियमितता निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती आहे असे गृहीत धरता येणार नाही.
५. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्यांची पुर्तता करावी.
६. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.
७. सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वितीकरणाच्या विविध टप्प्यांवर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५ ,मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०३) (०२) ,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास म विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान )संगणक संकेतांक ४७०१ एच ७५४) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.४२/२०१९ का.१४३४,दि.०५/०३/२०१९ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२५६/व्यय-१२, दि.१३/०९/२०१९ अन्वये तसेच मा. मंत्रिमंडळाने दि.३१.०१.२०२३ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०८१८१२३१३२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.08 18:18:19 +05'30'

**(प्रसाद नार्वेकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र: परिशिष्ट" अ "**

प्रत-

१) मा. राज्यपाल ,महाराष्ट्र राज्य ,मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री ,महाराष्ट्र राज्य ,मंत्रालय ,मुंबई.

३) सर्व मा. मंत्री /मा .राज्यमंत्री ,महाराष्ट्र राज्य ,मंत्रालय ,मुंबई.

४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य ,(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

५) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

## पुरंदर उपसा सिंचन योजना जि. पुणे या प्रकल्पास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता

शासन निर्णय क्र: पुरंदर ०११२/प्र. क्र/(२०१२/४७). मोप्र १ दि. ०८/०३/२०२३

**परिशिष्ट अ**

**प्रकल्पाची उपशीर्षनिहाय किंमत**

(किंमत रु. कोटी)

| अ. क्र. | उपशीर्ष | मूळ प्रशासकीय मान्यतेप्रमाणे किंमत | सुधारीत प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत |
|---|---|---|---|
| I | **शिर्षकामे** | | |
| १ | अे- प्राथमिक. | ०.०४४१ | २.७८ |
| २ | बी- भूसंपादन | ०.४७६९ | १३.८६ |
| ३ | सी - कामे | ११४.७५ | १८६.८१९७ |
| ४ | डी – विमोचक | ० | ० |
| ५ | एफ - आरएचटी कामे | ० | ० |
| ६ | जी - ब्रिजेस | ० | ० |
| ७ | एच - एस्केप | ० | ० |
| ८ | के - ईमारत | ०.६९७६ | ०.४८२२ |
| ९ | एल - मातीकाम | ० | ० |
| १० | एम - वनीकरण | ०.०२२५ | ०.१०५१ |
| ११ | ओ - संकीर्ण | ०.१९५५ | ०.५८३२ |
| १२ | पी - देखभाल | ०.२८७८ | १३.०१०४ |
| १३ | क्यु - टी अँड पी | ०.३६०५ | ० |
| १४ | आर - दळणवळण | ०.१० | १.९६ |
| १५ | एक्स – पर्यावरण मान्यता | ० | ०.३०२५ |
| | **शिर्षकामाची एकुण किंमत** | **११६.९३** | **२१९.९२** |
| II | **मुख्य कालवा** | | |
| १ | अे- प्राथमिक | ०.०५८४ | १.७० |

| अ. क्र. | उपशीर्ष | मूळ प्रशासकीय मान्यतेप्रमाणे किंमत | सुधारीत प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत |
|---|---|---|---|
| २ | बी- भूसंपादन | २.८३ | २.८१ |
| ३ | सी - कामे | १.७७ | १६४.९१ |
| ४ | डी – विमोचक | .१५ | ० |
| ५ | एफ - आरएचटी कामे | १.६२ | ० |
| ६ | जी - ब्रिजेस | १.०२ | ० |
| ७ | एच - एस्केप | ०.०१२५ | ० |
| ८ | के - ईमारत | ०.५७ | १.२८ |
| ९ | एल - मातीकाम | ७.६९ | ० |
| १० | एम - वनीकरण | ०.४५ | .३८ |
| ११ | ओ - संकीर्ण | ०.०४११ | ०.५६ |
| १२ | पी - देखभाल | ०.०३८५ | ०.९९ |
| १३ | क्यु - टी अँड पी | ०.४१ | ० |
| १४ | आर - दळणवळण | ०.२१ | १.९१ |
| १५ | एक्स – पर्यावरण मान्यता | ० | ० |
| | मुख्य कालवा एकुण (II) | १६.८८ | १७४.५४ |
| III | वितरिका | ९.७८ | ५६.५२ |
| IV | कालवा व वितरीका एकुण(II + III ) | २६.६६ | २३१.०६ |
| | एकूण | १४३.५९ | ४५०.९८ |
| | अनुषंगीक खर्च | ३५.३३५६ | ९.९७ |
| | **एकूण** ( I + IV ) | **१७८.९३** | **४६०.९५** |

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.08 18:18:32 +05'30'

**(प्रसाद नार्वेकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**